तारापोरवाला मत्स्यालय,चर्नी रोड,मुंबई येथील प्रवेश दरात वाढ करणे व छायाचित्रण शुल्क आकारणीस मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन व मत्स्य व्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र.मत्स्य-२०१५/प्र.क्र.२ /पदुम-१२,**

**मंत्रालय,मुंबई-४०००३२.**

**दिनांक:- ५ फेब्रुवारी,२०१५.**

**प्रस्तावना:-**

आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या क्रमांक जा.क्र.मत्स्य/ भू/ ताम/ ०४१११२७/५०५/२०१४,दिनांक:३०/१२/२०१४ च्या पत्रानुसार तारापोरवाला मत्स्यालय, चर्नी रोड, मुंबई येथील प्रवेशशुल्क दरात वाढ करणे व छायाचित्रण शुल्क आकारणेस मान्यता प्रदान करणेबाबत प्रस्तावित केले आहे. शासन ज्ञापन क्रमांक मत्स्यआ-२००२/१२७३/प्र.क्र.९६/पदुम-१२, दिनांक: ३१ मार्च,२००३ च्या शासन ज्ञापनाद्वारे मत्स्यालयाच्या प्रवेश दरात वाढ करण्यात आली होती. गेल्या १२ वर्षात कोणत्याही प्रकारची वाढ करण्यात आलेली नाही. सद्या मत्स्यालयाचे सेकंड व थर्ड जनरेशन स्वरुपात नुतनीकरणाचे काम चालू आहे. मात्र मत्स्यालय परिरक्षण खर्चात सातत्याने होत असलेली वाढ, विद्युत दर,जल दर व इतर कर यांच्यात होत असलेली वाढ, सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे वेतन व इतर भत्ते यामध्ये झालेली वाढ आणि मत्स्यालयासाठी आवश्यक मासे, मत्स्य खाद्य व आवश्यक साहित्य यामध्ये बाजारभावाप्रमाणे प्रतिवर्षी होणारी वाढ या सर्व बाबींचा विचार करता तारापोरवाला मत्स्यालय, मुंबई येथील प्रवेश शुल्कामध्ये वाढ करण्याचे व छायाचित्रण शुल्क आकारण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

तारापोरवाला मत्स्यालय, मुंबई येथील प्रवेश शुल्कामध्ये पुढीलप्रमाणे वाढ करण्यास व त्यानुसार सुधारीत दर वाढीस व छायाचित्रण शुल्क आकारणीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

**सुधारीत प्रवेशशुल्क दरवाढ:-**

| अ. क्र. | प्रेक्षक वर्ग | सुधारीत दर |
|---|---|---|
| १ | १२ वर्षांवरील प्रति व्यक्ती (प्रौढां करीता) - Adult | ६० |
| २ | ०३ ते१२ वर्षे प्रति लहान मुलांकरीता - Child | ३० |
| ३ | शैक्षणिक संस्थांचे पुरस्कृत गट सवलतीचे दर - Concession Rate | ३० |
| ४ | सेवानिवृत्त लष्करी व शासकीय अधिकारी - Retired person | ४० |
| ५ | शासकीय कर्मचारी - Govt. Employees | ३० |
| ६ | आंतरराष्ट्रीय प्रेक्षक (१२ वर्षावरील) - International visitors | २०० |
| ७ | आंतरराष्ट्रीय मुले (०३ ते १२ वयोगट) - International child visitors | १०० |
| ८ | अपंग व्यक्ती - Disabled Persons | ३० |

२. मत्स्यालयात चलचित्रिकरण व स्थिर चित्रिकरण करण्यासाठी या आदेशान्वये खालील दराने “ अ ते ई” या अटी व शर्तीवर मंजूरी देण्यात येत आहे.

**छायाचित्रण शुल्क/** Photography Charges :-

| **अ.क्र.** | **कॅमेऱ्याचा प्रकार** | **कॅमेरा शुल्क दर** |
|---|---|---|
| १ | मोबाईल फोनवरुन छायाचित्रण | ५००/- |
| २ | व्हिडियो कॅमेरा, डिजीटल कॅमेरा | १०००/- |
| ३ | प्रोफेशनल स्टील कॅमेरा | ५०००/- |
| ४ | प्रोफेशनल व्हिडीयो शुटींग | १०,०००/- |

**अटी व शर्ती:-**

अ) चित्रिकरण करणाऱ्याने योग्य शुल्क भरुन त्याची पावती तसेच छायाचित्रण पास घेणे आवश्यक आहे. शुल्क न भरता चित्रिकरण करणाऱ्या व्यक्तीकडून दंड म्हणून रु.२०००/- वसूल करण्यात यावेत. दंड वसूल करण्याचे अधिकार अभिरक्षकांना राहतील.

ब) चित्रिकरण करण्यास परवानगी देताना चित्रिकरणामुळे मत्स्यालयाच्या कामकाजात व्यत्यय येणार नाही तसेच प्रत्यक्ष माश्यांना त्रास होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

क) मत्स्यालयातील केवळ माश्यांच्या हालचालींचे चित्रिकरण करण्यास परवानगी देण्यात यावी. माश्यांच्या हालचालीसह हावभाव करुन दाखविणाऱ्या व्यक्तींचा त्यात समावेश करुन चित्रिकरण करता येणार नाही.

ड) कॅमेरा प्लॅश वापरण्यावर बंदी असेल जेणेकरुन माश्यांना त्रास होणार नाही.

इ) प्रोफेशनल स्टील कॅमेरा व प्रोफेशनल व्हिडियो शुटींग करणाऱ्यांनी/फिल्म कंपन्यांनी चित्रिकरणाची परवानगी किमान एक आठवडा अगोदर घेणे बंधनकारक आहे.

ई) जरी चित्रिकरण करण्यास परवानगी देण्यात आली तरी ती कोणतेही कारण न दाखविता रदद करण्याचा हक्क आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांच्याकडे राहिल. छायाचित्रण शुल्क म्हणून जमा करण्यात आलेली रक्कम परत दिली जाणार नाही. याबाबत योग्य असलेली प्रकरणे शासनाच्या आदेशासाठी सादर करण्यात यावीत.

३. मत्स्यालयाच्या प्रवेशशुल्क व छायाचित्रण शुल्कापोटी जमा होणारी रक्कम शासन आदेश क्र.मत्स्यआ-२०१२/प्र.क्र.२९२/पदुम-१२,दिनांक:-२६/१२/२०१२ अन्वये उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा (PLA) खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

४. सदर आदेशान्वये तारापोरवाला मत्स्यालयाच्या ऑनलाईन तिकिट आरक्षण व विक्रिस मान्यता प्रदान करण्यात येत आहे. ऑनलाईन तिकिट विक्रीशुल्काची रक्कम जमा होण्यासाठी वेगळे बँक खाते उघडण्यात यावे. सदर जमा रक्कम PLA खात्यामध्ये जमा करण्यात यावी. ऑनलाईन तिकिट रदद करावयाचे असल्यास कमीत कमी २४ तास आधी रदद करणे अनिवार्य राहिल. त्यानंतरच तिकिटाची रक्कम परत मिळेल.

५. तारापोरवाला मत्स्यालयासाठी महानगर गॅस लिमिटेड यांनी मध्यवर्ती वातानूकूलित यंत्रणा पुरस्कृत केली असल्याने प्रवेश तिकिटांवर त्यांच्या कंपनीचा लोगो छापण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. मत्स्यालयाचे सवलतीने प्रवेश मिळविण्यासाठी राज्यातील व राज्याबाहेरील शैक्षणिक संस्थांनी प्रत्यक्ष मत्स्यालय भेटी अगोदर आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्याकडे अर्ज करावा. आयुक्त यांचेकडुन पुर्वी अनुमती घेऊन मान्यता प्राप्त झाली तरच त्या शैक्षणिक संस्थांना सवलतीच्या दराचा लाभ देण्यात येईल. राज्याबाहेरील शैक्षणिक संस्थांनी प्रत्यक्ष मत्स्यालय भेटी अगोदर अर्ज करुनही काही कारणाने आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची मान्यता प्राप्त झाली नाही तर राज्याबाहेरील शैक्षणिक संस्था ज्या दिवशी प्रत्यक्ष भेट देतील त्याच दिवशी आयुक्तांची मान्यता घेवून प्रवेश देण्यात येईल. ही सुधारीत कार्यपध्दती सवलतीच्या दराकरीता लागू करण्यात यावी. याबाबत शालेय शिक्षण विभागाने राज्यातील/राज्याबाहेरील सर्व शैक्षणिक संस्थांना त्याप्रमाणे सुचना दयाव्यात.

सुधारीत प्रवेश शुल्क दरवाढ व छायाचित्रण शुल्क आकारणीची अंमलबजावणी तारापोरवाला मत्स्यालयाच्या नुतनीकरणाचे काम पुर्ण झाल्यानंतर मत्स्यालय प्रेक्षकांना खुले करण्यात येईल त्या दिवसापासून अंमलात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१२३८५११११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Parvez Ahmad Shahabuddin

Digitally signed by Parvez Ahmad Shahabuddin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Parvez Ahmad Shahabuddin
Date: 2015.02.05 12:49:21 +05'30'

**(प.श.अहमद)**,
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-५१
२) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),मुंबई

३) सचिव,शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

४) सचिव,उच्च व तंत्रशिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

५) मा.मंत्री (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक

६) मा.राज्यमंत्री (मत्स्य), यांचे स्वीय सहाय्यक

७) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई

८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई-५१.

९) वित्त विभाग (व्यय-१/कराधान-१)

१०) सर्व कक्ष अधिकारी (पदुम कक्ष)

११) निवड नस्ती.